महाराष्ट्र ग्रामदान मंडळास २०१५-२०१६ सहायक अनुदान देणे.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्रामदान-२०१५/प्र.क्र.११३/ज-१अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १९ ऑक्टोबर, २०१५.

वाचा :-

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.जीडीएन १०७४/१६०७/ग-२, दि.१६.५.१९७६.
२) महसूल व वन विभाग,शासन निर्णय व अधिसूचना क्र.भूदान ०७/२००८/प्र.क्र.१०६/ज-१, दि.५.९.२००८.
३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.बीयुडी-२०१५/२२२५/प्र.क्र.९८/ब-१, दि. ०१.०४.२०१५.
४) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.बीयुडी-२०१५/२२२५/प्र.क्र.९८/ब-१, दि. २१.०४.२०१५.
५) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि.१४.४.२०१५.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र ग्रामदान मंडळाची पुर्नस्थापना मा. श्री.आबा पांडुरंग कांबळे यांच्या अध्यक्षतेखाली शासन राजपत्रातील अधिसूचना क्र.जीडीएन ०८/२०१२/प्र.क्र.२९/ज-१, दि.१७.११.२०१२ अन्वये करण्यात आलेली आहे. महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. जीडीएन-१०७४/१६०७/ग-२, दि.१६.५.१९७६ रोजीच्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र ग्रामदान मंडळाला अनुदान देण्याबाबत अटी व शर्ती विहित करण्यात आल्या आहेत.

**०२.** महाराष्ट्र ग्रामदान मंडळास कार्यकर्त्यांचे मानधन, कार्यालयीन खर्च, कार्यकर्ता प्रशिक्षण व इतर किरकोळ खर्च इत्यादीवरील खर्च भागविण्याकरिता सन २०१५-१६ च्या अर्थसंकल्पात रु.५,००,०००/- (रुपये पाच लाख फक्त) इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे. संदर्भ क्र.४ व ५ अन्वये अर्थसंकल्पीत निधीपैकी एकूण वार्षिक तरतूदीच्या ७० टक्केच्या मर्यादेत म्हणजेच रु.३.५० लक्ष इतकी रक्कम प्रथम आठमाहीसाठी वितरित करण्यास मंजूरी देण्यात आली आहे. त्यानुसार अध्यक्ष, महाराष्ट्र ग्रामदान मंडळ यांना अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे अर्थसंकल्पीत निधीपैकी एकूण वार्षिक तरतूदीच्या ७० टक्केच्या मर्यादेत, म्हणजेच रु.३.५० लक्ष इतक्या रकमेचा निधी या कार्यक्रमासाठी उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. सबब, महाराष्ट्र ग्रामदान मंडळास रु.३.५० लक्ष इतकी रक्कम मंजूर करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेली तरतूद "आहरण व संवितरण अधिकारी, रोख शाखा, " महसूल व वन विभाग यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे.

**०३.** अध्यक्ष, महाराष्ट्र ग्रामदान मंडळ यांनी सन २०१५-१६ करीता मंजूर वितरीत अनुदानातून केलेल्या खर्चाचा ताळमेळ घालून आणि लेखापरीक्षण करुन,लेखापरीक्षण अहवाल शासन सादर करावा.

**०४.** सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात महाराष्ट्र ग्रामदान मंडळाला या आदेशाद्वारे मंजूर करण्यात आलेली अर्थसंकल्पीत निधीपैकी एकूण वार्षिक तरतूदीच्या ७० टक्के मर्यादेत " सी-५-२२२५-अनुसूचित जमाती व इतर मागास वर्ग यांचे कल्याण -८०- सर्वसाधारण -८०००-इतर खर्च- (००) (०२)- महाराष्ट्र ग्रामदान मंडळाला सहाय्यक अनुदान-(२२२५००६५), (दत्तमत) ३१-सहायक अनुदान (योजनेत्तर)" या लेखाशिर्षा खाली खर्ची टाकण्यात यावी.

**०५.** महाराष्ट्र विनियोजन अधिनियम,२०१५, निधी वितरण अनुषंगाने शासनाच्या वित्त विभागाने निर्गमित केलेल्या परिपत्रक क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३ दि. १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्ठातील बाब.क्र.४ मध्ये नमूद केल्यानुसार प्रस्तुत जुन्या योजनेत्तर योजनेच्या स्वरूपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत नसल्याने वित्त विभागाची सहमती आवश्यक नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०१९१३२०३९७११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil S Kothekar

Digitally signed by Sunil S Kothekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=c55205ca6d1113bfaec735bd2d1c5326d6b007c5cd3a46a6e4c4857e58ad2afe, cn=Sunil S Kothekar
Date: 2015.10.19 13:20:57 +05'30'

**सुनिल कोठेकर**
**अवर सचिव, महसूल व वन विभाग**

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखापरीक्षा) (लेखा व अनुज्ञयेता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
२) अधिदान लेखा अधिकारी, मुंबई
३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४) मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव./वि.का.अ., मंत्रालय, मुंबई-३२.
५) मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
६) प्रधान सचिव (महसूल) यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मुंबई-३२
७) सह सचिव (रोख शाखा) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८) उप सचिव, (ब-१) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९) उपसचिव,(ज-१) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०) श्री.आबा पांडुरंग कांबळे, अध्यक्ष, महाराष्ट्र ग्रामदान मंडळ, ८२, श्याम प्रभा, रमाबाई आंबेडकर नगर, मु.पो.नेहरोली, ता.वाडा,जि.पालघर-४२१३१२.

११) कार्यासन अधिकारी, रोखशाखा, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) कार्यासन अधिकारी, ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३) वित्त विभाग, अर्थसंकल्प -४ / व्यय-९, मंत्रालय, मुंबई
१४) कार्यासन अधिकारी, ल-१ सेल, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१५) सचिव, महाराष्ट्र ग्रामदान मंडळ, ८२, श्याम प्रभा, रमाबाई आंबेडकर नगर, मु.पो.नेहरोली,ता.वाडा,जि.पालघर-४२१३१२.
१६) निवडनस्ती (ज-१अ)